जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) च्या
कार्यप्रणालीत सुसूत्रता आणणे व सुधारणा करण्याच्या
अनुषंगाने त्रिसदस्यीय समिती गठीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीएपी १०२३/प्र.क्र.१४०/का.१४८१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - २५ मे, २०२३

**प्रस्तावना :-**

मा.श्री.आशिष जयस्वाल, वि.स.स. यांनी सन २०२३ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात महाराष्ट्र विधानसभा नियम १०५ अन्वये जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) च्या कार्यप्रणालीत सुसूत्रता व सुधारणा करण्याच्या अनुषंगाने लक्षवेधी सूचना उपस्थित केली होती.

सदर लक्षवेधी सूचनेवरील दिनांक २१/०३/२०२३ रोजी चर्चेच्या वेळी मा.उपमुख्यमंत्री महोदयांनी "जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) च्या कार्यप्रणालीत शाश्वत विकास ध्येय व Vision Document २०३० यांच्याशी सांगड घालून सुसूत्रता आणणे व सुधारणा करण्याच्या अनुषंगाने तसेच जिल्हा वार्षिक योजनेमधून रोजगार निर्मिती / वृध्दीकरीता उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने सन्माननीय सदस्य ॲड.(श्री.) आशिष जैस्वाल यांची समिती तयार करण्यात येईल. त्या समितीमध्ये माझ्या कार्यालयाचे सचिव श्री.श्रीकर परदेशी आणि नियोजन सचिवांचा समावेश करण्यात येईल."असे आश्वासन दिले आहे. सदर आश्वासन विचारात घेता, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत रोजगार निर्मिती / वृध्दीकरीता उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने त्रिसदस्यीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) च्या कार्यप्रणालीत सुसूत्रता आणणे व सुधारणा करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे त्रिसदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे.

१) मा.ॲड.(श्री.) आशिष जयस्वाल, आमदार
२) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग
३) श्री.श्रीकर परदेशी, मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव

२. सदर समितीने, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या विविध योजनांची शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) व Vision Document, २०३० यांच्याशी सांगड घालणे, जिल्ह्यासाठी आवश्यक बाबींची गरज ओळखून त्याची पूर्तता करणे, इ. बाबींच्या अनुषंगाने जिल्हा वार्षिक योजनेच्या कार्यप्रणालीत सुसूत्रता आणणे व आवश्यक त्या सुधारणा करण्याबाबत, त्याचप्रमाणे जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत रोजगार निर्मितीच्या योजना राबवून रोजगार निर्मिती / वृध्दीकरीता उपाययोजना याबाबत अभ्यास करुन आपला अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५२५१६२४३६३२१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJEEV HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2023.05.25 16:25:14 +05'30'

**( सं.ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.ॲड.(श्री.) आशिष जयस्वाल, आमदार
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्री.श्रीकर परदेशी, मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त (सर्व),
५. जिल्हाधिकारी (सर्व),
६. सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय,
७. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व) ,
८. निवड नस्ती/ का.१४८१.